**नंदुरबार जिल्ह्यालील सरदार सरोवर प्रकल्प, पुनर्वसन गावठाण क्र.१३, न्युबन व क्र.१४, मोड ता. तळोदा तसेच गावठाण क्र. ११ काथर्देदिगर, ता. शहादा या पुनर्वसित गावठाणात पुरवावयाच्या नागरी सुविधांना शासनाची आगाऊ मंजुरी तथा प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. ससप्र-३१२५/प्र.क्र.३४/र-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- २७ मार्च, २०२५

**वाचा:-**

१. महसूल व वन विभाग, परिपत्रक क्र. आर.पी.ए.१०८७/सी.आर- २४/(१९८७)/र-१, दि. २ फेब्रुवारी, १९८७.
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. ससप्र-३१९२/मयपु प्र.क्र. ४०/र-५, दि. २६ फेब्रुवारी, १९९२.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. ससप्र-३१/२००४/प्र.क्र.२०/र-५, दि. ०६ फेब्रुवारी, २००४.
४. जिल्हाधिकारी तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांचे पत्र क्र. ससप्र/जमीन-२अ/कावि/०३/२०२४, दि.७ ऑगस्ट, २०२४
५. जिल्हाधिकारी तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांचे कार्यालयाचे कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदुरबार यांचे जा. क्र. नविविनं/प्रशा-३/३५३/सन २०२५,दि.४ मार्च, २०२५रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:**

नर्मदा नदीवरील सरदार सरोवर प्रकल्प हा बहुराज्यीय प्रकल्प आहे. उक्त प्रकल्पामुळे महाराष्ट्र राज्यातील विशेषत: नंदुरबार जिल्ह्यातील बाधित गावांमधील बाधित कुटुंबांच्या पुनर्वसनासाठी तयार करण्यात आलेल्या गावठाणांमध्ये नागरी सुविधा पुरविण्याकरीता शासनामार्फत संदर्भाधिन दि. २ फेब्रुवारी, १९८७ व दि. २६ फेब्रुवारी, १९९२ रोजी शासन निर्णय निर्गमित करुन निकष निश्चित करण्यात आले आहेत. तर, शासनामार्फत दि. ६ फेब्रुवारी, २००४ रोजी शासन निर्णय निर्गमित करुन सदर पुनर्वसनासंबंधाच्या कामांना प्रशासकीय मंजुरी देण्यासह उक्त पुनर्वसनाची अंमलबजवणीची कार्यवाही करण्याकरीता प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प म्हणून जिल्हाधिकारी, नंदुरबार यांना अधिकार प्रदत्त करण्यात आलेले आहेत. याशिवाय, संदर्भाधिन सन १९८७ च्या शासन निर्णयामध्ये अपवादात्मक परिस्थितीत ठरवून दिलेल्या प्रमाणापेक्षा जास्त खर्च होण्याची शक्यता असल्यास त्यास शासनाच्या संबंधित प्रशासकीय विभागाची प्रकल्प अधिकाऱ्यामार्फत आगाऊ मंजुरी घेऊन कामे पुर्ण करण्याबाबत स्पष्टपणे निर्देशित करण्यात आले आहे.

०२. जिल्हाधिकारी तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांच्या कार्यालयातील कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदुरबार यांनी संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावामधील नागरी सुविधांच्या कामांवर होणारा खर्च हा शासनाच्या वर नमूद सन १९८७ व सन १९९२ च्या शासन निर्णय/परिपत्रकातील विहीत तरतुदीनुसार अपवादात्मक परिस्थितीत शासनाने ठरवून दिलेल्या प्रमाणापेक्षा जास्त होणार आहे. तथापि, असा जास्तीच्या प्रमाणावर होणाऱ्या नागरी सुविधांच्या कामांना आगाऊ मंजुरी देण्याचे अधिकार उक्त सन १९८७ च्या शासन निर्णय/परिपत्रकान्वये शासनास प्रदत्त करण्यात आलेले असल्याने उक्त शासन निर्णयान्वये शासनास प्रदत्त केलेल्या अधिकारांचा वापर करुन जिल्हाधिकारी तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांच्या कार्यालयातील कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदुरबार यांनी तांत्रिक मान्यता देऊन शासनास सादर केलेल्या प्रस्तावामधील

एकूण रक्कम रु. २७९.९९ लक्ष इतक्या रकमेच्या नागरी सुविधांच्या कामांना शासनाची आगाऊ मंजुरी तथा प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रस्तावनेमध्ये नमूद विवेचनास अनुलक्षून जिल्हाधिकारी तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांच्या कार्यालयातील कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदुरबार यांच्या कार्यालयाकडुन प्राप्त झालेल्या पुनर्वसनाच्या ठिकाणी नागरी सुविधा पुरविण्याबाबतच्या खालील परिशिष्ट मध्ये नमूद कामांना खाली नमूद अटी तथा शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**" परिशिष्ट "**

| अ. क्र. | कामाचे नाव | तालुका | अंदाजपत्रकीय किंमत (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | पुनर्वसन गावठाण क्र. ११, काथर्देदिगर (मुळ गावठाण), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क. १० ते १२ व निवासी भूखंड क्र. ४२ ते १३ दरम्यान कॉंक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | १०.०० लक्ष |
| २ | पुनर्वसन गावठाण क्र. ११, काथर्देदिगर (मुळ गावठाण), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ४३ ते ४५ व खुली जागा दरम्यान कॉंक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | १०.०० लक्ष |
| ३ | पुनर्वसन गावठाण क्र. ११, काथर्देदिगर (मुळ गावठाण), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ४६ ते ४९ व खुली जागा ते अंगणवाडी दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | १०.०० लक्ष |
| ४ | पुनर्वसन गावठाण क्र. ११ काथर्देदिगर (मुळ गावठाण), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ४९ ते ५२ व अंगणवाडी ते निवासी भूखंड क्र.२९ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | १०.०० लक्ष |
| ५ | पुनर्वसन गावठाण क्र. ११, काथर्देदिगर (विस्तारित टप्पा क्र. १), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. २५ ते स्टनड पोस्ट व निवासी भूखंड क्र. २७ ते २६ तसेच भुखंड क्र. ७ ते ८ व निवासी भूखंड क्र. १९ ते १८ दरम्यान कॉंक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | ९.९९ लक्ष |
| ६ | पुनर्वसन गावठाण क्र. ११, काथर्देदिगर (विस्तारित टप्पा क्र. १), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ८ ते १० व भूखंड क्र. १८ ते १६ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | १०.०० लक्ष |
| ७ | पुनर्वसन गावठाण क. ११, काथर्देदिगर (विस्तारित टप्पा क्र. १), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. १० ते १२ व भूखंड क्र. १६ ते १४ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | १०.०० लक्ष |
| ८ | पुनर्वसन गावठाण क्र. ११, काथर्देदिगर (विस्तारित टप्पा क्र. १), ता. शहादा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. १२ ते पब्लिक यूटीलिटी व भूखंड क्र. १४ ते १३ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | शहादा | १०.०० लक्ष |
| ९ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. १२ ते १३ व खुली जागा दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. १३ ते २८ व खुली जागा ते निवासी भूखंड क्र. २९ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| ११ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ११ ते ९ व निवासी भूखंड क्र. १४ ते १६ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १२ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ८ ते ४ व निवासी भूखंड क्र. १७ ते १९ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १३ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ३ ते २ व निवासी भूखंड क्र. २० ते २१ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १४ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ५ ते ४ व निवासी भूखंड क्र. ६ ते ७ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १५ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. २२ ते २१ व लगतचा गट दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १६ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भुखंड क्र. २१ ते २ व लगतचा गट दरम्यान कॉक्रोट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १७ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. १ ते २ व लगतचा गट दरम्यान कॉँक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १८ | पुनर्वसन गावठाण क्र. १३, न्युबन, ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे गावठाणाच्या प्रवेशास गाव रस्त्यापासून पोहोच रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| १९ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (विस्तारित टप्पा-१), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. २५ ते २७ व निवासी भूखंड क्र. २४ ते २२ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २० | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (विस्तारित टप्पा-१), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. २८ ते ३० व निवासी भूखंड क्र. २१ ते १९ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २१ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (विस्तारित टप्पा-१), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. १३ ते १५ व निवासी भूखंड क्र. १२ ते १० दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २२ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (विस्तारित टप्पा-१), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. १६ ते १८ व निवासी भूखंड क्र. ९ ते ७ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २३ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (मुळ गावठाण), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ९७ ते ८० व निवासी भूखंड क्र. ३१ ते ३० दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २४ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (मुळ गावठाण), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ७९ ते ६४ व निवासी भूखंड क्र. १९ ते १८ दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २५ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (मूळ गावठाण), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भूखंड क्र. ६४ ते सुविधा जागा व निवासी भूखंड क्र. १८ ते ६ दरम्यान | तळोदा | १०.०० लक्ष |

| | | | |
|---|---|---|---|
| | कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | | |
| २६ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (मूळ गावठाण), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे सुविधा जागा व निवासी भूखंड क्र. ६ ते मोकळी जागा दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २७ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (मूळ गावठाण), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे सुविधा जागा व नाला पड दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| २८ | पुनर्वसन गावठाण क्र. १४, मोड (विस्तारित टप्पा-१), ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे निवासी भुखंड क्र. ४ ते ६ व मोकळी जागा दरम्यान कॉक्रीट रस्ता बांधकाम करणे. | तळोदा | १०.०० लक्ष |
| | **एकूण रु.** | | **२७९.९९ लक्ष** |

०२. वर **परिशिष्ट** मध्ये नमूद एकूण रक्कम रु. २७९.९९ /- लक्ष इतक्या नागरी सुविधांच्या कामांकरीता लागणारा खर्च हा," नागरी सुविधा पुरविण्याबाबतची उक्त नमूद विविध कामे ही सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात नागरी सुविधा व इतर कामांसाठी "मागणी क्र. आय-५, ८२९, सरदार सरोवर प्रकल्प (००) (०१) अधिक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे (४८०१ ३७४२)" या लेखाशीर्ष अंतर्गत नमूद तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

०३.**<u>अटी तथा शर्ती:-</u>**

१) सदर मंजुर निधी हा ज्या मंजुर तथा शासन मान्यता प्राप्त कामांसाठी मंजुर करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी खर्च करण्यात यावा.
२) सदर कामांना तांत्रिक मंजुरी देण्यात यावी.
३) मंजुर कामांव्यतीरिक्त अन्य कामांसाठी खर्च करावयाचा असल्यास त्याकरीता शासनाची पुर्व परवानगी घेण्यात यावी. कोणत्याही परिस्थीतीत कार्योत्तर मंजुरीसाठी सदर प्रस्तावाचा विचार केला जाणार नाही. सदर बाब ही वित्तीय अनियमितता समजून संबंधितांविरुध्द प्रशासकीय कारवाई करण्यास ग्राह्य धरली जाईल.
४) कोणत्याही परिस्थितीत मंजुर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची खबरदारी घ्यावी.
५) मंजुर निधीच्या विनियोगाबाबत महाराष्ट्र वित्तीय नियमावलीचे तसेच, इतर अन्य वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
६) उर्वरित निधीची मागणी करण्यापुर्वी निधीच्या विनीयोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र मंजुर कामांच्या सद्यस्थिती व गुणवत्ता प्रमाणपत्रासह शासनास सादर करण्यात यावे. कामाच्या गुणवत्तेकरीता त्रयस्थ पक्ष म्हणून शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाच्या किंवा आय.आय.टी च्या स्थापत्य शाखेकडून तपासणी करुन घेण्यात यावी.
७) मंजुर कामांच्या प्रगतीचा मासीक अहवाल शासनास सादर करावा.
८) उक्त नागरी सुविधा पुरविण्याबाबतची सर्व कामे ही प्रस्तूत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून बारा महीन्यांच्या कालावधीत पुर्ण करण्यात येऊन सदर कामे पुढील देखभाल व दुरुस्तीसाठी तात्काळ ग्रामपंचायतीच्या मार्फत जिल्हा परिषद, नंदुरबारकडे हस्तांतरीत करण्यात यावीत.
९) तथापि, काही अपरिहार्य कारणास्तव किंवा नैसर्गिक आपत्तीमुळे सदर मंजुर कामे विहीत केलेल्या कालावधीतच पुर्ण करणे शक्य होत नसल्यास त्याबाबत उचित कारणमिमांसेसह व स्पष्टिकरणांसह

प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावा. तथापि, सदर वाढीव कालावधी हा सहा महिन्यापेक्षा जास्त असणार नाही.

१०) परंतु, सदर कामांच्या पुर्ततेसाठी कोणत्याही परिस्थितीत भविष्यात कसल्याही प्रकारे भाववाढ किंवा सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येणार नाही.

११) पुनर्वसनाच्या व नागरी सुविधेच्या कामांचे जी. आय. एस. मॅपींग करुन झालेल्या कामांची छायाचित्रे अक्षांस रेखांशासह गुगल मॅपवर टाकण्यात यावीत.

१२) सदर कामे अन्य कोणत्याही शासकीय योजनेत यापुर्वी केलेली नाहीत याची खातरजमा जिल्हाधिकारी, तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांनी करावी जेणेकरुन कामांची द्विरुक्ती होणार नाही .

१३) उक्त नमूद काही कामांत साम्य तथा कामांची द्विरुक्ती आढळून आल्यास सदर कामे वगळण्याबाबत शासनास तात्काळ विनंती करुन सदर कामे वगळण्यात यावीत.

१४) उपरोक्त रस्त्यांची कामे अन्य कोणत्याही योजना अथवा निधीमधून पुर्वी केलेली नाहीत ही खातरजमा जिल्हाधिकारी, नंदुरबार यांनी करुन तसे प्रमाणीत करुन प्रस्तूत कामांना निधी वितरीत करण्याची दक्षता घ्यावी.

१५) वर नमूद सर्व अटी तथा शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही जिल्हाधिकारी तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांची राहील.

१६) प्रस्तूत शासनाच्या आगाऊ मंजुरी तथा प्रशासकीय मान्यतेस अनुलक्षून आवश्यकतेनुसार निधी वितरणाची कार्यवाही हि आंतरवित्तीय सल्लागार तथा सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी करावी. त्यासाठी संबंधित कार्यालयाशी आवश्यक तो पाठपुरावा जिल्हाधिकारी तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार यांनी करावा.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१६०९४६५३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY
SHANKARRAO INGLE

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D337930B14433DC62C0154AF2BBC60BB5A6EDCAA66B7F34596C50A27EB0F6333, cn=SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2025.03.27 16:10:43 +05'30'

**(संजय इंगळे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव ( मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय , मुंबई.
५. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
७. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी ३ प्रती)
८. जिल्हाधिकारी तथा तथा प्रकल्प संचालक, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार.
९. आंतर वित्तीय सल्लागार तथा सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्तीय सल्लागार तथा सहसचिव, महसूल व वन विभाग (म.व पु.) मंत्रालय, मुंबई.
११. सहसचिव कार्यासन र-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. अप्पर जिल्हाधिकारी/उपजिल्हाधिकारी, सरदार सरोवर प्रकल्प, नंदुरबार/तळोदा.
१३. अधिक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे.
१४.कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदुरबार.
१५. उप विभागीय अधिकारी, शहादा/तळोदा.
१६. कोषागार अधिकारी, नंदुरबार.
१७. निवड नस्ती, र-५.